# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
### शासन निर्णय क्रमांकः अनुवि ४९१७/(३२/१७)/अर्थसंकल्प,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०१ जुलै, २०१७

**संदर्भ : -**

१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प-३, दिनांक १ एप्रिल, २०१७
२) शासन निर्णय क्र. अनुवि ४९१७/(३२/१७)/अर्थसंकल्प, दिनांक ५ एप्रिल, २०१७
३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७
४) शासन निर्णय क्र. अनुवि ४९१७/(३२/१७)/अर्थसंकल्प, दिनांक ५ मे, २०१७
५) शासन निर्णय क्र. अनुवि ४९१७/(३२/१७)/अर्थसंकल्प, दिनांक २० मे, २०१७
६) शासन निर्णय क्र. अनुवि ४९१७/(३२/१७)/अर्थसंकल्प, दिनांक २५ मे, २०१७
७) शासन निर्णय क्र. अनुवि ४९१७/(३२/१७)/अर्थसंकल्प, दिनांक २९ मे, २०१७
८) शासन निर्णय क्र. अनुवि ४९१७/(३२/१७)/अर्थसंकल्प, दिनांक ९ जून, २०१७
९) शासन निर्णय क्र. अनुवि ४९१७/(३२/१७)/अर्थसंकल्प, दिनांक १७ जून, २०१७
१०) शासन निर्णय क्र. अनुवि ४९१७/(३२/१७)/अर्थसंकल्प, दिनांक २१ जून, २०१७

**प्रस्तावना -**

वित्त विभागाकडून उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये बीम्स प्रणालीवर प्राप्त झालेला अनुदानाचा निधी नियंत्रक अधिकारी ( सह सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई ) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षातील शालेय शिक्षण व क्रीडा विभागासाठी अर्थसंकल्पित झालेला व वित्त विभागाकडून BEAMS प्रणालीवर प्राप्त झालेला निधी पुढीलप्रमाणे नियंत्रक अधिकाऱ्यांच्या अधिनस्त ठेवण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | नियंत्रक अधिकारी | वितरीत अनुदान |
|---|---|---|---|
| | **मागणी क्रमांक ई - २, २२०२ सर्वसाधारण शिक्षण** | | |
| १ | २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जाती उपयोजना (०१) अनुसूचित | सह सचिव (प्रशासन) शालेय शिक्षण व क्रीडा | ३९७९९६ |

| अ.क्र. | लेखाशिर्ष | नियंत्रक अधिकारी | वितरीत अनुदान |
|---|---|---|---|
| | जाती उपयोजना (०१) (०१) सर्व शिक्षा अभियान (अनुसूचित जाती उपयोजना) (केंद्र हिस्सा) (२२०२।०७६) | विभाग, मंत्रालय, मुंबई | |
| २ | २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ८००, इतर खर्च (००) (००) (०६) सर्व शिक्षा अभियान योजना (विशेष घटक योजना) (केंद्र पुरस्कृत योजना) (२२०२ ३०८३) | सह सचिव (प्रशासन) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई | २६५३३० |

२. सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षात वितरीत केलेला उपरोक्त निधी / अनुदान आंहरण व संवितरण अधिकाऱ्यांना खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून तातडीने वितरीत करण्यात यावा :-

१) ज्या उद्देशासाठी निधी / अनुदान मंजूर आहे त्या व्यतिरिक्त इतर उद्देशासाठी खर्च करता येणार नाही. तसेच इतर लेखाशिर्षाकडे वळती करता येणार नाही.

२) सदर खर्चाचा प्रगती अहवाल मासिक निधी विवरणपत्रानुसार नियंत्रक अधिकाऱ्यांनी दरमहा शासनास १० तारखेपर्यंत सादर करावा.

३) वेतनेत्तर अनुदान वितरीत करताना वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र. ७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१, उपविभाग एक मधील अनुक्रमांक ६, नियम ४० प्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता घेवून अनुदान अदा करावे.

४) वेतन अनुदानाची थकबाकी अदा करताना अनुक्रमांक ४, नियम ३९ (ब) टिप - ४, अनुक्रमांक ५, नियम ३९, (ब) टिप - ५ अन्वये तसेच अनुक्रमांक ६ नियम ४० प्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेवून अनुदान अदा करावे.

५) महानगरपालिका, नगरपालिका यांना देण्यात येणारी वेतनेत्तर अनुदाने वित्त विभागाच्या अनुमतीशिवाय खर्च करता येणार नाहीत.

६) खाजगी स्वंयसेवी संस्थांना अनुदान उपलब्ध करुन देताना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१, उपविभाग एक मधील अनुक्रमांक २७, नियम १४९ प्रमाणे सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेवून अनुदान अदा करावे.

७) ज्या तरतूदी वितरणासाठी प्रशासकीय मान्यता आदेशाची आवश्यकता आहे अशा तरतूदी वितरीत करताना भाग-१, उपविभाग-तीन, अनुक्रमांक-चार, नियम २७ (२) अन्वये प्रदान केलेल्या अधिकाराप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आदेश निर्गमित झाल्यानंतर अनुदान वितरीत करावे.

८) जिल्हा परिषदांसाठीचे वेतनेत्तर अनुदान त्यांचे अनुदान निर्धारण झाल्याशिवाय वितरीत करु नये.

९) नवीन खर्चाच्या अनुषंगाने नवीन बाबीव्दारे तरतूद केलेल्या योजनांच्या निधी वितरणासंदर्भात वित्त विभागाची मान्यता आवश्यक आहे.

१०) केंद्र पुरस्कृत योजनांसंदर्भात केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री संबंधित विभागाने नस्त्यांवर वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करुन घ्यावी व तदनंतरच केंद्रिय निधी प्राप्त झाला असल्यास सदर निधी तसेच राज्य शासनाच्या समरुप हिस्सा प्रशासकीय विभागाने त्याचे स्तरावर वितरीत करावा. तथापि, मागील वर्षामधील केंद्र शासनाचा निधी चालू वर्षी खर्च करावयाचा असल्यास त्यास वित्त विभागाची सहमती घेणे आवश्यक आहे.

११) विविध शासकीय / प्रशासकीय संस्थांना तसेच अनुदानित संस्थांना सहायक अनुदाने मंजूर करण्यापूर्वी त्यांचेकडून पूर्वी खर्च केलेल्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे विभागाने प्राप्त करावीत. तसेच ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानाचा ७५% विनियोग पूर्ण झाल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत करण्यात येऊ नये.

१२) स्थानिक स्वराज्य संस्थांना वेतनेत्तर अनुदाने वितरीत करण्यापूर्वी सदर संस्थांकडून राज्य शासनास येणे असणाऱ्या रकमांचा आढावा घेण्यात यावा व त्या वसूल करुनच उर्वरीत अनुदान वितरीत करण्यात यावे.

१३) वैयक्तिक लाभार्थीच्या योजनेची देयके आहरित करताना लाभार्थ्यांची यादी निश्चित करुन योग्य त्या तपशिलासह देयकासोबत जोडल्याशिवाय वैयक्तिक लाभार्थ्यांची अनुदाने आहरित करण्यात येऊ नयेत. शक्यतो अशा लाभार्थ्यांचे आधार क्रमांक पण नमूद करावेत.

१४) शिष्यवृत्ती / शिक्षणशुल्काची प्रतिपूर्ती, वैयक्तिक लाभार्थी तसेच सवलती पोटी दिलेले अनुदान इत्यादीची प्रदाने, इलेक्ट्रॉनिक्स क्लिअरन्स सिस्टीम (ECS) नेच अदा करण्यात यावीत. शक्यतो अशा सर्व बाबी आधार क्रमांकाशी निगडीत कराव्यात.

१५) बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्रशासकीय मान्यता / तांत्रिक मान्यता तसेच आवश्यक तेथे सचिव समितीची मान्यता प्राप्त करुन घेतल्याशिवाय विभागाने खर्च करु नये. त्याचप्रमाणे हा निधी ठेव बांधकामाचे स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करु नये.

१६) "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका", उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने त्यांच्या क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग, दि. १.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रसिध्द केली आहे. सदर शासन निर्णय व त्यासोबतच्या मार्गदर्शक सूचनाप्रमाणे खरेदीप्रक्रीया पूर्ण करुन पुरवठादार निश्चित झाल्याशिवाय तसेच या मार्गदर्शक सूचनेतील अटींचे पालन करुन खरेदीची देयके कोषागारातून आहरित करण्यात यावीत. खरेदीविषयक धनादेश संबंधित पुरवठादाराच्याच नावांने व शक्यतो इलेक्ट्रॉनिक्स क्लिअरन्स सिस्टीमव्दारे (ECS) अदा करण्यात यावी.

१७) विविध कारणांमुळे अखर्चित राहिलेला निधी विभागांनी त्यांच्या अधिनस्त महामंडळाकडे हस्तांतरीत करुन तांत्रिकदृष्टया खर्च झाल्याचे दाखविले जाते, ही एक गंभीर अनियमिता आहे, याची विभागांनी नोंद घ्यावी. तसेच त्यांच्या अधिनस्त असलेला यापूर्वीचा अखर्चित निधी (स्वीय प्रपंजी खात्यातील / महामंडळाच्या खात्यातील वा इतर प्रकारे खर्च दर्शवून बाहेर ठेवण्यात आलेला) संपूर्णत: खर्च झाल्याशिवाय तरतुदी आहरीत वा वितरीत करु नये. याठिकाणी असेही निदर्शनास आणण्यात येते की, स्वीय प्रपंजी लेख्याखाली विभागांकडे बऱ्यांच मोठया प्रमाणावर निधी अखर्चित असल्याचे दिसून

येते. सदर निधीचा ताळमेळ घालून व लेखा परिक्षण करुन सदर निधी जर खर्च करावयाचा नसल्यास तो शासनाच्या तिजोरीत परत करण्यात यावा.

१८) विभागांमार्फत करण्यात येणारे संगणकीकरण संदर्भातील खर्च माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या क्रमांक मातसं/१७१६/प्र.क्र.२८६/३९ दिनांक ९ ऑगस्ट, २०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार करण्यात यावा.

१९) थकित देयकांच्या प्रदानासाठी खर्च करण्यात येणाऱ्या प्रकरणी खरेदी केलेले साहित्य प्रत्यक्ष प्राप्त झाल्याचे व त्याचे लेखे सुयोग्यरित्या ठेवल्याची खात्री पटल्याशिवाय तो निधी आहरित करण्यात येऊ नये.

३. सदर शासन निर्णय अर्थसंकल्प नियम पुस्तिका १७ व नियम १४२, तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील नियम क्र. १४९ आणि वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०११८०३०३६८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Vijay Shelar

Digitally signed by Deepak Vijay Shelar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd30ed620a4fe01f24cb84cc86e70f3b8f6f1fdcdb2469570c78dabb9acf4ba, cn=Deepak Vijay Shelar
Date: 2017.07.01 18:02:51 +05'30'

( दीपक वि. शेलार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे स्वीय सहायक
२. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
३. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य
४. प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे

१३. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
१४. सहसचिव / उपसचिव ( प्रशासन / प्राथमिक / माध्यमिक / अर्थसंकल्प / समन्वय) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य. / प्राथमिक / प्रौढ व अल्पसंख्यांक / SCERT / महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद) महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८. सर्व क्रीडा उपसंचालक
१९. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी
२०. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२१. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२२. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / प्रौढ)
२३. सर्व अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक / माध्यमिक)
२४. वित्त विभाग (व्यय-५ / व्यय-१४ /अर्थसंकल्प - ८) मंत्रालय, मुंबई
२५. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२६. निवड नस्ती, कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.